**राज्य, राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर अतुलनीय कामगिरी केलेल्या वयोवृध्द (कुस्तीगीर) खेळाडूंना मानधन देण्यासाठी निधी वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: निविप्र-४०२५/प्र.क्र.१३४/क्रीयुसे-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १७ जून, २०२५.

वाचा:-

१. शासन निर्णय समाजकल्याण सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्र -सेनिवे-१०९१/प्र.क्र.८२/क्रीयुसे -१,दिनांक १० जून, १९९३.
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. क्रीडायो-२०१२/प्र.क्र.६४/१२/क्रीयुसे-२, दि. २१.१२.२०१२.
३. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.राक्रीपु-३१२२/प्र.क्र.४९/क्रीयुसे-२, दि.०४.०३.२०२४
४. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.पुरवणी-३५२४/प्र.क्र.४८/क्रीयुसे-२, दि.२७.०२.२०२५.
५. सहसंचालक, क्रीडा व युवक सेवा,पुणे यांचे पत्र क्र. वयोखेमानधन/नि.वि.प्रस्ताव/२०२५-२६/का.६/७०४, दि. २१.०५.२०२५

प्रस्तावना-

राज्य/राष्ट्रीय/आंतरराराष्ट्रीय स्तरावर अतुलनीय कामगिरी केलेल्या वयोवृध्द (कुस्तीगीर) खेळाडूंना मानधन देण्याची योजना संदर्भ क्र. (१) येथील दि.१० जून, १९९३ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित करण्यात आली आहे. राष्ट्रीय /आंतरराराष्ट्रीय स्तरावर अतुलनीय कामगिरी केलेल्या वयोवृध्द खेळाडूंना तसेच किताब प्राप्त कुस्तीगीरांना देण्यात येणाऱ्या मानधनाचे दर संदर्भ क्र. (२) येथील दि. २१ डिसेंबर, २०१२ च्या शासन निर्णयान्वये कुस्तीगिरांच्या मानधनात वाढ करण्यात आली होती. दरम्यानचा दिर्घ कालावधी विचारात घेवून राष्ट्रीय /आंतरराराष्ट्रीय स्तरावर अतुलनीय कामगिरी केलेल्या वयोवृध्द खेळाडू तसेच किताब प्राप्त कुस्तीगीरांना देण्यात येणा-या मानधनात वाढ करण्यास संदर्भ क्र.३ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

२. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील एकूण पात्र १११ पात्र लाभार्थी वयोवृध्द (कुस्तीगीर) खेळाडूंना एप्रील, २०२४ ते मार्च, २०२५ तसेच ५ वयोवृध्द (कुस्तीगीर) खेळाडूंना सप्टेंबर, २०२४ ते

मार्च, २०२५ पर्यंतचे अशा एकुण ११६ वयोवृध्द (कुस्तीगीर) खेळाडूंना मानधन रु.१३८.६० लक्ष इतका निधी वितरित करण्यास दि.२७.०२.२०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

त्यानुसार सन २०२३-२४ या वर्षात मार्च महिन्याचे वयोवृध्द खेळाडू मानधन जुन्या दरानेच देण्यात आले होते त्यामुळे सुधारीत संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयाच्या दिनांकापासून प्रदान करणे आवश्यक आहे. त्यानुसार माहे मार्च, २०२४ च्या मानधनाच्या फ़रकाची रक्कम म्हणून रु.६,५३,०२३/- इतका निधी, सन २०२४-२५ या वर्षातील उपलब्ध निधीच्या अनुषंगाने एकुण ११४ लाभार्थ्यांपैकी ६१ खेळाडूंचे मार्च, २०२५ व एका खेळाडूंचे सप्टेंबर, २०२४ ते मार्च, २०२५ पर्यंतचे (एकुण ७ महिने) मानधन असे एकुण रु.६,८०,०००/- इतका निधी तसेच सन २०२५-२६ या वर्षातील ११४ लाभार्थी वयोवृध्द खेळाडूकरिता माहे एप्रिल ते जुलै, २०२५ या कालावधीतील रु.४८.८५ लक्ष असे एकुण रु.६२,१८,०२३/- इतके मानधन अदा करण्यासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२५-२६ या आर्थिक वर्षातील राज्य / राष्ट्रीय / आंतरराष्ट्रीय स्तरावर अतुलनीय कामगिरी केलेल्या वयोवृध्द (कुस्तीगीर) खेळाडूंना मानधन अदा करण्यासाठी रु.६२,१८,०२३/- ( रुपये बासष्ट लाख अठरा हजार तेवीस फक्त ) इतका निधी मंजूर करण्यात येत आहे. तसेच सदर निधी आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. या संदर्भात होणारा खर्च “मागणी क्र.ई-३, २२०४-क्रीडा व युवक सेवा-१०४ क्रीडा व खेळ (०८)(०२) राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर उल्लेखनीय कामगिरी केलेल्या नामवंत खेळाडूना मानधन (२२०४-१६५८), ३१ सहायक अनुदाने वेतनेतर” या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ मधील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे, त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

I. यापूर्वी वितरित केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावयाच्या अटीच्या अधीन राहून निधी वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

II. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेवू नये.

III. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर योजनेअंतर्गत वयोवृध्द (कुस्तीगीर) खेळाडूंना मानधन मंजूर करतांना संदर्भाधीन शासन निर्णयामधील अटी व शर्ती लागू राहतील.

४. शासनाच्या सूचनांनुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधीत उपसंचालक/जिल्हा क्रीडा अधिकारी/लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. अनौ.सं.क.६७०/व्यय-५, दि.०९.०६.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६१७१६०९०२१४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL PANDURANG PANDHARE

Digitally signed by SUNIL PANDURANG PANDHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Scl Edu Sports Dept, 2.5.4.20=7F874792415B92BA519384CACB41B53A89CF93DBD96D4BE1F7D97FB6326EED47, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8B7DC58E83C9774E4419A7AEEAC77EAE7CDEA272D759DFB29451BCFE7E3F04C9, cn=SUNIL PANDURANG PANDHARE
Date: 2025.06.17 16:10:56 +05'30'

**( सुनिल पांढरे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन, राज्य उत्पादन शुल्क) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४) मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास, गृहनिर्माण, सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

५) मा.मंत्री, क्रीडा व युवक कल्याण, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

६) मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.

७) मा. विधानसभा/विधानपरिषद सदस्य महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय

८) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

९) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१०) अपर मुख्य सचिव, क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

११) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) -१/२, महाराष्ट्र , मुंबई/नागपूर.

१२) महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१/२,महाराष्ट्र, मुंबई/नागपूर

१३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई. (क्रीडा संचालनालयामार्फत)

१४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत)

१५) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे (क्रीडा संचालनालयामार्फत)

१६) लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे. (क्रीडा संचालनालयामार्फत)

१७) सर्व उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत)

१८) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१९) उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२०) उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, (क्रीडा संचालनालयामार्फत)

२१) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (संचालनालयामार्फत)

२२) वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई-३२.

२३) अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

२४) निवड नस्ती (क्रीयुसे-२).